**महाराष्ट्र शासनाने भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून सन १९७९-८० ते १९९३-९४ या वर्षात गृहनिर्माण योजना, जमीन संपादन आणि विकास योजनेकरीता घेतलेल्या ऋणापोटी व्याजाची सन २०१४-१५ मधील परतफेड करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

गृहनिर्माण विभाग,

शासन निर्णय क्रमांकः एलआयसी-२०१४/प्र.क्र.५२/अर्थसं-१

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२

तारीख: ७ नोव्हेंबर,२०१४.

वाचा -

१) भारतीय आयुर्विमा महामंडळाचे पत्र क्र.सीओ/आयएमए/आयआरएल,दि.२३ सप्टेंबर,२०११.

## शासन निर्णय--

शासनाने भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून सन १९७९-८० ते १९९३-९४ या वर्षात वेगवेगळया गृहनिर्माण योजना,जमीन संपादन आणि विकास योजना यासाठी कर्ज घेतलेले आहे. सदरहू ऋणाच्या पोटी मुद्दलाच्या हप्ता दरवर्षी आणि ऋणावरील व्याजाचा हप्ता दर सहामाही मध्ये आयुर्विमा महामंडळाला त्यांचेशी करण्यात आलेल्या करारपत्राप्रमाणे अदा करावयाचा आहे. त्यानुसार सोबत जोडलेल्या विवरणपत्राप्रमाणे सन २०१४-२०१५ मध्ये प्रलंबित ऋणापोटी दि.१५ नोव्हेंबर,२०१४ रोजी दुस-या हप्त्याच्या देय व्याजाच्या फेडीसाठी होणा-या रु. ५५,**०००/- (अक्षरी रुपये पंचावन्न हजार फक्त**) इतक्या खर्चास शासन मंजूरी देत आहे.

२. या बाबीकरीता होणारा खर्च, “मागणी क्रमांक -क्यु-१ २०४९, व्याज प्रदाने ०१ देशांतर्गत ऋणावरील व्याज- २०० इतर देशांतर्गत ऋणारील व्याज- (००),(००)(०१) भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून घेतलेल्या कर्जावरील व्याज, (भारित) ४५, व्याज (२०४९ ०८२४) “या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१४-२०१५ करीता मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. भारतीय आयुर्विमा महामंडळाने त्यांच्या दि.२३ सप्टेंबर,२०११ च्या पत्रान्वये त्यांचे सर्व आर्थिक व्यवहार दि.१५ सप्टेंबर,२०११ पासून ई-पेमेंट द्वारे करण्यात आल्याचे कळविले आहे. त्यानुसार भारतीय आयुर्विमा महामंडळास सदर व्याजाची रक्कम अदा करण्याकरिता आहरण व संवितरण अधिकारी (अ.स.रोखशाखा) यांच्या नावे कोषागाराकडून आहरित करण्यात येईल. त्यानुसार आहरण व संवितरण अधिकारी (अ.स.रोखशाखा) हे सदर देय व्याजाची रक्कम भारतीय आयुर्विमा महामंडळास अदा करण्याबाबत स्टेट बँक ऑफ इंडिया,मुंबई ,मुख्य शाखा यांना सूचना देतील. यासाठी स्टेट बँक ऑफ इंडीया,मुंबई ,मुख्य शाखेचा खाते क्रमांक-१०९९६६८२७६७,एमआयसीआर क्रमांक-४००००२०१० व आयएफएससी क्रमांक SBIN०००३०० असा आहे.

४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून सदर रक्कम आहरित करण्यासाठी या विभागाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीमती रोहिणी पुरळकर,अवर सचिव आणि नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.प्र.ल.पाठक,सह सचिव यांना घोषित करण्यात येत आहे. हा शासन

निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५६१/व्यय-३,दिनांक ३१ ऑक्टोबर,२०१४ अन्वये विभागास दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११११११५३००३१०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arjun Pandharinath Gaikwad

Digitally signed by Arjun Pandharinath Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arjun Pandharinath Gaikwad
Date: 2014.11.11 12:02:39 +05'30'

**(अ.पं.गायकवाड)**
**कक्ष अधिकारी**

प्रत,

१) भारतीय आयुर्विमा महामंडळ,योगक्षेम,जीवन विमा मार्ग,मुंबई-२१.
२) महालेखापाल-१,(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
३) महालेखापाल-२,(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
४) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
५) संचालक,लेखा व कोषागारे,मुंबई.
६) निवासी लेखा अधिकारी, ,मुंबई.
७) अवर सचिव ,भारत सरकार,नागरी विकास मंत्रालय, नवी दिल्ली-११००११.
८) कक्ष अधिकारी,अर्थ-१७,/अर्थोपाय/व्यय-३/ऋण व हमी संनियंत्रण कक्ष/वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.
९) कक्ष अधिकारी,कार्यासन १४१४ व १४७४,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१०) सह सचिव(श्री.पाठक)/अवर सचिव (श्रीमती पुरळकर) गृहनिर्माण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
११) रोख शाखा(४ सहीच्या प्रती,देयके बनविण्यासाठी) गृहनिर्माण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
**१२)** निवड नस्ती (अर्थसंकल्प-१) गृहनिर्माण विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

प्रत आवश्यक कार्यवाहीस्तव अग्रेषित-

उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी **अधिकारी महाराष्ट्र** गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.

वित्त नियंत्रक,महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,गृहनिर्माण भवन,वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.

****************************************

शासन निर्णय कमांक - एलआयसी-२०१४/प्र.क्र.-५२/अर्थसं-१, दिनांक : ७ नोव्हेंबर, २०१४. चे सहपत्र

**आयुर्विमा महामंडळाकडून घेतलेल्या कर्जाच्या सन २०१४-२०१५ या वर्षातील दि ५/११/२०१४ रोजी देय व्याज अदायगीचे विवरणपत्र.**

| अ.क्र. | कर्जाचे वर्ष | कर्जाची रक्कम (रुपये लाखात) | कर्जाचा संकेतांक | व्याजाचा दर | देय व्याज (रक्कम रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १९८९-९० | २५०.०० | ११०७/००४० | ११ | ५५,०००/- |

(व्याज-रु.५५,०००/- (अक्षरी पंचावन्न हजार फक्त)

Arjun Pandharinath Gaikwad

Digitally signed by Arjun Pandharinath Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arjun Pandharinath Gaikwad
Date: 2014.11.11 12:04:12 +05'30'

(अ.पं.गायकवाड)
कक्ष अधिकारी